**महाबळेश्वर नगरपालिका क्षेत्रास “ब” वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०१९/९/प्र.क्र.५८९/ पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २८ सप्टेंबर, २०२०.

<u>संदर्भ</u> :- १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१०/८/ प्र.क्र.४६३/पर्यटन, दि.४/११/२०१०.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०११/१२/ प्र.क्र.८५५/पर्यटन, दि.१६/१/२०१२.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१६/११/ प्र.क्र.८६२/पर्यटन, दि.२५/४/२०१७.
४) जिल्हाधिकारी, सातारा यांचे पत्र क्र. नियोजन/ब वर्ग / पर्यटन / का- ६/३०११, दि.३१.०८.२०१९ व २.३.२०२०.

**<u>प्रस्तावना</u> :**

जिल्ह्यातील ‘ब’ वर्ग पर्यटनस्थळांची निवड करुन प्रस्ताव शासनाला सादर करण्याबाबतचे अधिकार संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये, संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयामधील जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीस प्रदान करण्यात आले आहेत. तसेच राज्यातील ‘ब’ वर्ग पर्यटनस्थळ घोषित करण्यासाठी निकष व कार्यपध्दती संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

२. महाबळेश्वर गिरीस्थान नगरपालिका क्षेत्र हे भौगोलिक दृष्टया पर्यटनस्थळ म्हणून प्रसिध्द आहे. ते समुद्र सपाटीपासून १४३८ मी. उंचीवर थंड हवेचे ठिकाण आहे. पावसाळ्यामध्ये जुन ते ऑक्टोबर अखेर पूर्ण काळ  मोठ्या प्रमाणावर पाऊस असतो. या कालावधीत महाबळेश्वर शहर व परिसरात सूर्यदर्शनही होत नाही. त्यामुळे या मौसमाचा आनंद घेण्यासाठी पर्यटक पावसाळ्यामध्येही या शहरास व परिसरातील पर्यटनस्थळांना भेट देतात. तसेच सुमारे १०० ते १५० वर्षापूर्वी शहरास पाणी पुरविण्यासाठी नगरपालिकेने वेण्णा नदीवर एक टाके बांधलेले आहे. त्यावर स्वातंत्र्यपूर्व काळापासून सन १९३५ पासून पर्यटकांना बोटींगचा अनुभव दिला जातो. महाबळेश्वर येथे प्रसिध्द असे ढग संशोधन केंद्र असून त्यामध्ये समुद्रसपाटीपासून उंचावर असणाऱ्या मौसमी वाऱ्यांचा व ढगांचा अभ्यास केला जातो. या शहरामध्ये मोरारजी कॅसल या बंगल्यामध्ये महात्मा गांधी यांचे वास्तव्य होते.

३. जिल्हाधिकारी, सातारा यांनी संदर्भ क्र. ४ येथील दि.३१.८.२०१९ च्या पत्रान्वये महाबळेश्वर नगरपालिका क्षेत्रास “ब” वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्यात यावा, अशी शिफारस केली आहे. मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.१.२.२०२० रोजी झालेल्या सातारा जिल्हा आढावा बैठकीमध्ये महाबळेश्वर या पर्यटन क्षेत्रास एक विशेष बाब म्हणून “ब” वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याबाबत कार्यवाही करण्याचे निदेश मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिले आहेत. त्यानुसार महाबळेश्वर नगरपालिका क्षेत्रास “ब” वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाबळेश्वर नगरपालिका क्षेत्रातील पर्यटनस्थळांना दरवर्षी साधारणत: १७ ते १८ लक्ष देशी व विदेशी पर्यटक भेट देत असतात. पर्यटकांची संख्या भविष्यात आणखी वाढण्याची शक्यता आहे. या सर्व बाबी तसेच सदर पर्यटनस्थळाचे राज्यस्तरीय महत्व, मोठ्या प्रमाणात भेट देणाऱ्या पर्यटकांची संख्या, ऐतिहासिक व भौगोलिक महत्व इत्यादी बाबी विचारात घेता, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीएस २०१६/११/प्र.क्र.८६२/पर्यटन, दि.२५.४.२०१७ अन्वये राज्यातील “ब” वर्ग पर्यटनस्थळे घोषित करण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या निकष व कार्यपध्दती नुसार क्र.८ येथील निकषास अपवाद करुन “एक विशेष बाब” म्हणून महाबळेश्वर नगरपालिका (ता. महाबळेश्वर, जि. सातारा) क्षेत्रास “ब” वर्ग पर्यटनस्थळ म्हणून घोषित करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९२५१२४२४७३०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2020.09.29 16:08:01 +05'30'

**( र. ज. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

| | |
|---|---|
| १) मा. राज्यपाल यांचे सचिव<br>२) मा. मुख्यमंत्राचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई<br>३) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.<br>४) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई<br>५) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद<br>६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा<br>७) सर्व मा. विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद<br>८) सर्व मा. विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा<br>९) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव<br>१०) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव<br>११) प्रधान सचिव (पर्यटन) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | १२) विभागीय आयुक्त, पुणे.<br>१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.<br>१४) संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.<br>१५) जिल्हाधिकारी, सातारा.<br>१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा<br>१७) अतिरिक्त जिल्हाधिकारी तथा जिल्हा पर्यटन समन्वय अधिकारी, सातारा<br>१८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>१९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)<br>२१) जिल्हा नियोजन अधिकारी, सातारा<br>२२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाची सर्व कार्यासने<br>२३) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई<br>२४) निवड नस्ती, पर्यटन |

***